**महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील गट विकास अधिकारी (एस-२०) संवर्गातील अधिकाऱ्यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी (एस-२३) संवर्गात तात्पुरती पदोन्नती देणेबाबत .**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**

शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२१/प्र.क्र.१७९/२०२१/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: १६ मार्च,२०२३

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र विकास सेवा गट-अ मधील गट विकास अधिकारी (वेतन स्तर एस-२० : ५६१००-१७७५००) या संवर्गातील श्रीम. डी.एच.बापट यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी (वेतन स्तर एस-२३ : ६७७००-२०८७००) या संवर्गात तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे .

२. सामान्य प्रशासन विभाग एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१ नुसार पदोन्नतीने नियुक्तीसाठी विहित केलेल्या महाराष्ट्र शासकीय गट -अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूल विभाग वाटप नियम , २०२१ मधील तरतुदींच्या अधिन, नागरी सेवा मंडळाच्या शिफारशी तसेच सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने श्रीम .बापट यांना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निव्वळ तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | तात्पुरत्या पदोन्नतीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्रीम.डी.एच.बापट,<br>उप मुख्य कार्यकारी अधिकारी,<br>(नियुक्तीशिवाय) | गट विकास अधिकारी, पंचायत समिती, परभणी, जिल्हा परभणी | रिक्त पदी |

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दि.०४.०८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाविरोधात राज्य शासनाने मा .सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ दाखल केली आहे. सदर याचिका अद्याप प्रलंबित आहे. सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१६ ब यांच्या शासन निर्णय दि.०७.०५.२०२१ मधील तरतूदी नुसार पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.०५.२००४ च्या स्थितीनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा .सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात येत आहेत.

रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टॅम्प नं.१०८७८/२०२१ मध्ये मा .उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि .२५.०५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

४. श्रीम.बापट यांना उप मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गात खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे :-

**<u>अटी व शर्ती :-</u>**

४.१) श्रीम.बापट यांना देण्यात येणारी अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील तात्पुरती पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधिन राहून देण्यात येत आहे .

४.२) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांना पदावनत करण्याच्या अधिन राहून सदर तात्पुरती पदोन्नती देण्यात येत आहे .

४.३) सदरची पदोन्नती तात्पुरत्या स्वरूपाची असून सदर पदोन्नती प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात येत आहे.

४.४) या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱी यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

४.५) श्रीम.बापट यांना पदोन्नतीने पदस्थापना दिलेल्या पदावर विहित कालावधीत रूजू होणे आवश्यक आहे .

५. उप मुख्य कार्यकारी अधिकारी संवर्गात तात्पुरती पदोन्नती दिलेल्या श्रीम .बापट यांनी त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रूजु व्हावे तसेच सदर पदाचा पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा. संबंधित अधिकाऱी यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन नियुक्ती रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३१६१४५३००७१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

DR. VASANT GOPAL MANE

Digitally signed by DR. VASANT GOPAL MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d895943ab6dff272f2ec1bd19f802a1f6a13602188e1b451ba8e7b4359630a60, pseudonym=999F7A73B01EC277FB3617082F8FD2105799C4CB, serialNumber=C621B4190E31904B3DEA97E81C85A31BBAAFF04C1ADEA8A8811D74F01DA4E724, cn=DR. VASANT GOPAL MANE
Date: 2023.03.17 18:43:05 +05'30'

**( डॉ.वसंत माने )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,

२) मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव,

३) मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक,

४) विभागीय आयुक्त , पुणे व औरंगाबाद,

५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, परभणी,

६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे व परभणी,

७) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,

८) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.),

९) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग,

१०) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग.